**आदिम जमाती विकास कार्यक्रम अंतर्गत मंजूर “Establishment of Back Yard Poultry For PVTG Families” या योजनेच्या मार्गदर्शक तत्वांना मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः केंद्रीय-२०१९/प्र.क्र.१३८/का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०८/०१/२०२०

संदर्भ-

**१.जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/४(१४)/२०१६ Grants दि.०१/०३/२०१७**

**२. शासन निर्णय क्रमांक: आदिम-२०१७/प्र.क्र. ०४ /का.- १९ दिनांक-२१/०३/२०१७**

प्रस्तावना-

केंद्र शासनाकडून दरवर्षी विशेष केंद्रीय सहाय्य, भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत व आदिम जमाती विकास कार्यक्रम या योजना अंतर्गत राज्य शासनास अनुदान प्रदान होत असते. या योजनाअंतर्गत प्राप्त होणा-या अनुदानासाठी राज्य शासन मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समितिच्या मान्यतेने आदिवासी बांधवांच्या जनकल्याणाकरीता विविध योजना केंद्र शासनाकडे प्रस्तावित करण्यात येतात. राज्यात सद्य स्थितीला कोलम, कातकरी आणि माडिया गोंड ह्या तीन विशेष असुरक्षित जनजाती (आदिम जमाती ) आहेत. कुपोषण, रोगराई, बालमृत्यू, बेरोजगारी यासारखे अनेक प्रश्न या समाजापुढे आहेत. या जनजाती उपजीविकेसाठी प्रामुख्याने वन आणि पावसाळी शेतीवर अवलंबून आहेत. याच बरोबर त्यांना कुकुटपालन आणि शेळीपालनासारखे उपजीविकेची माध्यमे उपलब्ध आहेत. त्यांनी राहत्या घरच्या आजूबाजूला असलेल्या मोकळ्या जागेत कुकुटपालन केले तर त्यांच्या जवळ उपलब्ध असलेल्या जागेचा वापर तर होईल, त्यांना उत्पन्नाचे साधन देखील उपलब्ध होईल त्याच बरोबर त्यांची पोषण सुरक्षाही होईल. याच अनुषंगाने आदिम जमाती विकास कार्यक्रम योजने अंतर्गत सन २०१६-२०१७ या वर्षाकरिता “Establishment of Back Yard Poultry For PVTG Families” ही योजना केंद्र शासनाकडे प्रस्तावित करण्यात आली होती. जनजाती कार्य मंत्रालयाने दिनांक ०८/०२/२०१७ रोजी आयोजीत केलेल्या Project Appraisal ( Committee PAC) बैठकीमध्ये सदर योजना सन २०१६-१७ करिता आदिम जमाती विकास कार्यक्रम योजने अंतर्गत राबविण्यासाठी एकूण २००.०० लक्ष इतक्या रकमेच्या प्रस्तावास संदर्भाधिन पत्र क्र.१ अन्वये मंजुरी दिलेली असून सदर अनुषंगाने प्राप्त निधी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक यांना वितरीत करण्यात आला आहे.

२. राज्यातील आदिवासी भागात महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) उमेद मार्फत आदिवासी महिलांसाठी बचत गटाची स्थापना केली जाते. राज्यातील आदिवासी भागात उमेद (MSRLM) मार्फत महिला गट स्थापन करून त्यांची क्षमता बांधणी बरोबर आर्थिक सशक्तीकरण केले जाते. तसेच

आदिवासी महिलांच्या बचत गटाला आर्थिक स्थिरता मिळवून देण्यासाठी त्यांच्या मार्फत विविध उपक्रमही राबवविले जातात. सबब, आदिम जनजाती एकवटलेल्या क्षेत्रामध्ये उमेद (MSRLM) मार्फत आदिम जमतीच्या लाभार्थी कुटुंबांना कुकुट पालन सारखे उपजीविकेचे माध्यम उपलब्ध करून देऊन त्यांना मिळकतीचे साधन निर्माण होईल. तसेच त्यांची पोषण सुरक्षाही होण्यास मदत होईल सबब, "Establishment of Back Yard Poultry For PVTG Families" ही योजना उमेद (MSRLM) मार्फत राबविण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचनांना मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आदिम जनजाती एकवटलेल्या क्षेत्रामध्ये उमेद (MSRLM) मार्फत आदिम जमातीच्या कुटुंबांना कुकुट पालनासारखे उपजीविकेचे माध्यम उपलब्ध करून देऊन त्यांना उत्पन्नाचे साधन निर्माण करून देणे त्याच बरोबर त्यांची पोषण सुरक्षाही करण्यासाठी **"Establishment of Back Yard Poultry For PVTG Families"** ही योजना आदिवासी विकास विभाग व उमेद (MSRLM) यांच्यामार्फत संयुक्तपणे राबविण्यास मान्यता देण्यात येत असून त्यानुषंगाने एकुण रु २००.०० लक्ष किंमतीच्या प्रकल्पाच्या अंमलबजावणीबाबतच्या मार्गदर्शक सूचनांना या शासन निर्णया सोबत जोडलेल्या परिशिष्ट क्रमांक-१ नुसार मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत तरतूदींच्या मर्यादेत योजना राबविण्याबाबत त्वरीत कार्यवाही आयुक्त, आदिवासी विकास ,नाशिक यांनी करावी व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०८१७२६३१२८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Waje Prakash Vijay

Digitally signed by Waje Prakash Vijay
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1b4b695a8c26d140fc5c049d281eedbf23beed9a89ad7526416132cf28f14776, serialNumber=400892e5e82479e4f3c8cf46538dc917b7071e979796d37178d3b709e19155ab, cn=Waje Prakash Vijay
Date: 2020.01.08 17:11:03 +05'30'

**(प्रकाश वाजे)**
**कक्ष अधिकारी**

**प्रत,**

१) मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२) मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव,आदिवासी विकास,यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई
४) आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी उमेद (MSRLM), मुंबई
६) उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) अपर आयुक्त, आदिवासी विकास ठाणे,नाशिक,अमरावती व नागपुर

८) एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू/ शहापूर

९) संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई

१०) निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.

**परिशिष्ट-१** **(रुपये लाखात)**

<table>
<tr><td>१</td><td>योजनेचे नाव</td><td>“Establishment of Back Yard Poultry For PVTG Families”</td></tr>
<tr><td>२</td><td>योजनेचे प्रस्तावित लाभ क्षेत्र</td><td>अप्पर आयुक्त, आदिवासी विकास ठाणे यांचे कार्यक्षेत्र</td></tr>
<tr><td>३</td><td>वित्तीय तरतूद</td><td>
<table>
<tr><th>अ.क्र</th><th>वर्ष</th><th>योजना</th><th>निधी (लक्ष)</th></tr>
<tr><td>१</td><td>२०१६-१७</td><td>“Establishment of Back Yard Poultry For PVTG Families”</td><td>२००.००</td></tr>
<tr><td></td><td></td><td>एकूण</td><td>२००.००</td></tr>
</table>
</td></tr>
<tr><td>४</td><td>योजनेतील लाभार्थी / युनिट संख्या</td><td>एकूण लाभार्थी- १०५७
<table>
<tr><th>अ. क्र</th><th>जिल्ह्याचे नाव</th><th>तालुक्याचे नाव</th><th>एकूण गावांची संख्या</th><th>एकूण लाभार्थी सख्या</th></tr>
<tr><td>१</td><td>पालघर</td><td>डहाणू</td><td>११</td><td>६११</td></tr>
<tr><td>२</td><td>ठाणे</td><td>शहापूर</td><td>२३</td><td>४४६</td></tr>
<tr><td></td><td>एकूण</td><td></td><td>३४</td><td>१०५७</td></tr>
</table>
</td></tr>
<tr><td>५.</td><td>योजनेसाठी येणाऱ्या खर्चाचे सविस्तर अंदाजपत्रक</td><td>प्रती लाभार्थी व एकूण लाभार्थी यांचे सविस्तर खर्चाचे अंदाज पत्रक पुढील प्रमाणे आहे.
<table>
<tr><th>अ क्र</th><th>बाब</th><th>प्रती युनिट खर्च</th><th>एकूण युनिट</th><th>एकूण खर्च</th></tr>
<tr><td>१.</td><td>५० पक्षी (४ आठवडे वय)</td><td>३५००/-</td><td>१०५७</td><td>३६,९९,५००/-</td></tr>
<tr><td>२.</td><td>५० पक्षी साठी पिंजरा</td><td>५०००/-</td><td>१०५७</td><td>५२,८५,०००/-</td></tr>
<tr><td>३.</td><td>खादय व औषधे</td><td>८०००/-</td><td>१०५७</td><td>८४,५६,०००/-</td></tr>
<tr><td>४.</td><td>पाणी आणि फिडर</td><td>१५००/-</td><td>१०५७</td><td>१५,८५,५००/-</td></tr>
<tr><td>५.</td><td>पशू सखी किट</td><td>२०००/-</td><td>२३</td><td>४६,०००/-</td></tr>
<tr><td>६.</td><td>प्रशिक्षण (३ दिवस)</td><td>३००/-</td><td>१०५७</td><td>३,१७,१००/-</td></tr>
<tr><td>७.</td><td>प्रशासकीय खर्च(उमेद)</td><td>--</td><td>--</td><td>६,००,०००/-</td></tr>
<tr><td>८</td><td>मूल्यमापन व सनियंत्रण</td><td>--</td><td>--</td><td>१०,९००/-</td></tr>
<tr><td></td><td>एकूण खर्च</td><td></td><td></td><td>२,००,००,०००/-</td></tr>
</table>
</td></tr>
<tr><td>५</td><td>योजना राबवणारी यंत्रणा</td><td>सबंधित प्रकल्प अधिकारी व UMED- MSRLM ( Maharashtra State Rural Livelihood Mission)</td></tr>
</table>

| | | |
|---|---|---|
| ६ | **नियंत्रक अधिकारी** | अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे |
| ७ | **योजनेचा उद्देश/ हेतु** | १. ठाणे पालघर जिल्ह्यातील आदिम जमातीच्या कुटुंबाचे आर्थिक उत्पन्न वाढविणे.<br>२. आदिम जमातीच्या आदिवासी कुटुंबाला वर्षभराचे रोजगाराचे साधन उपलब्ध करून देणे.<br>३. आदिम जमातीच्या आदिवासी कुटुंबाचे आरोग्य व पोषण यामध्ये सुधारणा करणे.<br>४. आदिम जमातीच्या आदिवासी कुटुंबातील कुपोषित मुलांचे प्रमाण कमी करणे.<br>५. आदिम जमातीच्या आदिवासी कुटुंबाचे स्थलांतराचे प्रमाण कमी करणे. |
| ८ | **योजना अंमलबजावणीची कार्यपध्दती** | १. योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने MSRLM (उमेद) ही संस्था अमलबजावणी यंत्रणा म्हणून कामकाज करेल.<br>२. मंजुर तरतुदीच्या मर्यादेत प्रकल्पाच्या खर्चाचा तपशील व अंमलबजावणी वेळापत्रक हे आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक यांनी अंमलबजावणी यंत्रणेसोबत विचारविनिमय करून अंतिम करावे<br>३. योजनेच्या अनुषंगाने उमेद मार्फत कुकुट पालन करिता १०५७ लाभार्थ्यांची निवड केली जाईल.<br>४. लाभार्थ्यांची निवड प्रकल्प अधिकारी व उमेद(MSRLM) हे एकत्रित रित्या करतील.<br>५. लाभार्थी महिलांची यादी उमेद कडून संबंधित प्रकल्प अधिकारी यांना प्रदान करण्यात येईल. प्रकल्प अधिकारी यांचे अध्यक्षतेखालील समिती लाभार्थी यादी अंतिम करून उमेद यांना देण्यात येईल.<br>**प्रकल्प स्तरावरील निवड समिती खालील प्रमाणे असेल**.<br>अ) सबंधित प्रकल्प अधिकारी - अध्यक्ष<br>आ) सबंधित जिल्हा/तालुका पशुसंवर्धन अधिकारी- सदस्य<br>इ) सबंधित उमेद(MSRLM) प्रतिनीधी- सदस्य<br>ई) सहाय्यक प्रकल्प अधिकारी केंद्रीय योजना- सदस्य सचिव<br>६. निवड केलेल्या प्रत्येक लाभार्थी महिलांची उमेद(MSRLM) मार्फत क्षमता बांधणी केली जाईल.<br>७. योजनेच्या अनुषंगाने प्रत्येक लाभार्थ्याला ४ आठवडे वयाच्या ५० देशी कोंबड्या त्यांना निवा-यासाठी पिंजरा, पशू खाद्य (१ वर्षापर्यंत) व लसीकरण व वैद्यकीय सेवा MSRLM (उमेद) मार्फत पुरवली जाईल.<br>८. योजनेच्या अनुषंगाने उमेद (MSRL) मार्फत प्रत्येक गावासाठी पशू सखी/कृषि सखी यांची निवड करण्यात येईल तसेच त्यांना देण्यात येणारे मानधन उमेद मार्फत देण्यात येईल. |

९. पशू सखी /कृषि सखी या खालील प्रमाणे जबाबदारी पार पाडतील.

अ) पायाभूत सर्वेक्षण (base line survey)

आ) लाभार्थी महिलांची/बचत गटाची बकरी पालन,कुकुट पालन,कृषि या बाबत वेळोवेळी क्षमता बांधणी करणे.

इ) कृषि, बकरीपालन, कुकुटपालन या बाबत लाभार्थी महिलांचे प्रस्ताव तयार करणे.

ई) योजनेच्या अनुषंगाने घेण्यात येणा-या विविध बैठका,कार्यक्रम यांना उपस्थित राहणे.

योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने उमेद मार्फत अवलंबली जाणारी रणनीती पुढील प्रकारे असेल.

| **अ.क्र** | **बाब** | **आवश्यक बाब** | **जबाबदार व्यक्ति** |
|---|---|---|---|
| १ | निवडलेल्या गावांचे बेसलाइन सर्वेक्षण | बेसलाइन फॉरमॅट | कृषि सखी/ पशू सखी/ICRP/ CTC |
| २ | जिल्हा स्तरीय प्रशिक्षण (कुकुट पालन) | मोड्यूल | DMM/DM Convergence |
| ३ | CTC जिल्हा स्तरीय प्रशिक्षण (कुकुट पालन) | मोड्यूल | DMM/BMM/DM Convergence |
| ४ | तालुका स्तरीय ICRP चे आरोग्य बाबत प्रशिक्षण | मोड्यूल | DMM/DM/SRP |
| ५ | गावाच्या स्तरावर लाभार्थ्यांचे आरोग्य, कुकुट पालन ,पोषण वाटिका बाबत प्रशिक्षण | | DMM/BMM/DM Convergence |
| ६ | गावाच्या स्तरावर आरोग्य व पोषण बाबत कृती आराखडा, योजना तयार करणे, लाभार्थ्यानुसार आराखडा तयार करणे | | DMM/BMM/DM Convergence |
| ७ | लाभार्थ्यांचे प्रस्ताव तालुका स्तरीय समितीकडे तपासणीसाठी सादर व त्यांच्या मार्फत जिल्हा स्तरीय समितीस सादर | | DMM/BMM/DM Convergence |
| ८ | जिल्हास्तरीय यूनिट मार्फत महिला बचत गटांना निधिचे वाटप | | DMM/DM Convergence |
| ९ | लाभार्थ्यांमार्फत निधिचा उपयोग | | DMM/DM Convergence |

| | | |
|---|---|---|
| ९ | **योजनेच्या अटी व शर्ती** | ➢ योजना विहित वेळेत पूर्ण करण्याची जबाबदारी अंमलबजावणी करणाऱ्या संस्थेची असेल.<br>➢ योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने आऊट सोर्सिंग करण्याची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची राहिल.<br>➢ प्रकल्पामध्ये होणाऱ्या बदलाची पूर्वकल्पना प्रकल्प अधिकारी व सनियंत्रण व मूल्यमापन समितीला देऊन समितीच्या मान्यतेनेच बदल करावा.<br>➢ योजनेच्या अनुषंगाने निवड करण्यात येणारा लाभार्थीबाबत खालील बाबींचा विचार करावा<br>१) निवडलेला लाभार्थी हा आदिम जमातीचा महिला लाभार्थी असावा.<br>२) कुकुट पालन करण्याबाबत आवड असावी<br>३) विधवा,अपंग,निराधार महिला लाभार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे.<br>➢ योजनेच्या अनुषंगाने पुरविण्यात येणाऱ्या कोंबड्या ह्या देशी प्रजातीच्या ०४ आठवडे वयाच्या असाव्यात.<br>➢ योजनेच्या अनुषंगाने प्रत्येक लाभार्थ्याला ५० कोबड्यांची पिल्ले, त्यांना आवश्यक असणारे खाद्य, लसीकरण,खाद्य व पाणी देण्यासाठी आवश्यक असणारे साहित्य देणे अमलबजावणी यंत्रणेला बंधनकारक असेल.<br>➢ निवडल्या गेलेल्या प्रत्येक लाभार्थ्याला दिलेल्या कोंबड्यांचा सांभाळ किमान ०५ वर्ष करणे बंधनकारक राहील.<br>➢ प्रकल्प राबविताना आवश्यक असणारे प्रशिक्षण/कार्यशाळा व प्रात्यक्षिके संस्थेद्वारे देणे बंधनकारक असेल.<br>➢ योजनेच्या अनुषंगाने प्रत्येक लाभार्थ्याचे पूर्वीचे उत्पन्न व लाभ घेतल्यानंतर मिळालेले उत्पन्न या बाबत वार्षिक अहवाल सबंधित प्रकल्प अधिकारी यांना सादर करणे बंधनकारक राहील.<br>➢ योजनेच्या प्रगतीबाबत माहिती वेळोवेळी आयुक्त,आदिवासी विकास व शासनास सादर करण्याची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची राहील.<br>➢ अंमलबजावणी करणाऱ्या संस्थेला केलेल्या कामाचा पूर्तता अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक असेल.<br>➢ सदर योजनेची अंमलबजावणी करताना चलचित्र (video) व छायाचित्रे काढावीत व योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर योजनेचा फलनिष्पत्ती अहवाल शासनास सादर करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी व अंमल बजावणी यंत्रणा यांची राहील Geo-tagged photographs हे www.stcmis.gov.in या वेबसाईट वर अपलोड करण्याची जबाबदारी प्रकल्प अधिकारी यांची राहील.<br>➢ योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने योजनेच्या प्रगती बाबत माहिती वेळोवेळी CAS पोर्टल वर भरण्याची जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणेची असेल. |

<table>
<tr><td>१०</td><td>संनियंत्रण व अमलबजावणी समिती</td><td>योजनेचे संनियंत्रण व मुल्यमापना करीता पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.
<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>पदनाम</th><th>पद</th></tr>
<tr><td>१.</td><td>अप्पर आयुक्त, आदिवासी विकास,ठाणे</td><td>अध्यक्ष</td></tr>
<tr><td>२.</td><td>मुख्य कार्यकारी अधिकारी, उमेद</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>३.</td><td>सबंधित पशुसंवर्धन अधिकारी</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>४.</td><td>प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि प्रकल्प, शहापूर व डहाणू</td><td>सदस्य</td></tr>
<tr><td>५.</td><td>सहाय्यक आयुक्त/उप आयुक्त -केंद्रीय योजना, अप्पर आयुक्त ठाणे</td><td>सदस्य सचिव</td></tr>
</table>
➢ योजनेच्या अंमल बजावणीच्या अनुषंगाने करण्यात येणारे कार्य व त्याची प्रगती या बाबत अहवाल शासनास / आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक यांना सादर करण्याची जबाबदारी उपरोक्त समितीस असतील<br>
➢ योजनेची अंमलबजावणी सुरू झाल्यापासून उपरोक्त समितीची बैठक दर ४ महीन्यांनी आयोजित करावी व सदर बैठकीमध्ये योजनेच्या प्रगतीचा आढावा घेण्यात यावा तसेच योजना अंमलबजावणीमध्ये काही अडचणी असतील तर त्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी</td></tr>
<tr><td>११</td><td>योजनेची अंमलबजावणीचा कालावधी</td><td>शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून ०२ वर्ष</td></tr>
<tr><td>१२</td><td>निधी वितरण कार्यपध्दती</td><td>१. आयुक्त आदिवासी विकास,नाशिक यांच्यामार्फत योजनेसाठी मंजूर असलेला निधी अप्पर आयुक्त,आदिवासी विकास ठाणे यांच्याकडे वर्ग करण्यात येईल<br>
२. सदर निधी अप्पर आयुक्त, आदिवासी विकास ठाणे यांच्या मार्फत उमेद - महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान कक्षास प्रकल्प खर्चाच्या सुरवातीस प्रथम हफ्ता ५० टक्के रक्कम कार्यारंभ आदेशा वेळी अदा करतील.<br>
३. सनियंत्रण व मूल्यमापन समितीच्या शिफारशी नुसार दूसरा हप्ता ४० टक्के, प्रकल्पाच्या प्रगतीनुसार उमेद- महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान कक्षास अदा करण्यात येईल.<br>
४. प्रकल्प पूर्ण झाल्यानंतर योजनेचा फलनिष्पाती अहवाल, उपयोगिता प्रमाणपत्र, योजना पूर्णत्वाचा अहवाल उमेद ने सादर केल्यानंतर उरलेला १० टक्के निधी उमेदला अदा करण्यात येईल.<br>
५. योजनेच्या अनुषंगाने प्राप्त निधीपैकी सानियंत्रण व मूल्यमापणासाठी तरतूद केलेला निधी आयुक्त,आदिवासी विकास, नाशिक यांच्या स्तरावर राखून ठेवावा.</td></tr>
</table>

| | | |
|---|---|---|
| **१३** | **योजनेची फलनिष्पती** | १. ठाणे पालघर जिल्ह्यातील आदिम जमातीच्या कुटुंबाचे आर्थिक उत्पादनात वाढ होईल<br>२. आदिम जमातीच्या आदिवासी कुटुंबाला वर्षभराचे रोजगारचे साधन उपलब्ध होईल.<br>३. आदिम जमातीच्या आदिवासी कुटुंबाचे आरोग्य व पोषण यामध्ये सुधारणा होईल .<br>४. आदिम जमातीच्या आदिवासी कुटुंबातील कुपोषित मुलांचे प्रमाण कमी होण्यास मदत होईल. |